**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास मराठी भाषा फौंन्डेशन योजना तसेच स्पर्धा परीक्षा योजनाकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अविवि -२०१९/प्र.क्र.१६४/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०८ जानेवारी, २०२०.

**वाचा:-** (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९

(२) शा. नि. अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि २०१९/ प्र.क्र. ३५/का-७, दि.२५/१०/२०१९

(३) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/म.भा.फौ/प्र.क्र.४२५/२०१९/ का.३, दिनांक१४/११/२०१९चे पत्र व सहपत्र.

(४) शा. नि. अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि २०१९/ प्र.क्र. १६४/का-९, दि.०२/१२/२०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या (१) मराठी भाषा फाऊंडेशन वर्ग योजनांतर्गत सन २०१९-२० करिता नियुक्त करण्यात आलेल्या १०१५ मानसेवी शिक्षकांकरिता अनुदान (२) भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व परिक्षा प्रशिक्षण केंद्र, मुंबई, नागपूर, कोल्हापूर आणि औरंगाबाद येथील आणि यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या केंद्रामध्ये प्रत्येकी १० अल्पसंख्यांक उमेदवारांना प्रवेश देऊन प्रशिक्षण देण्याकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अनुदान वितरीत करण्यात येते. उपरोक्त संदर्भ क्र.४ वरील शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत असून बिम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेली तरतूद विचारात घेऊन सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठी भाषा फौंन्डेशन वर्ग आणि स्पर्धापरीक्षा प्रशिक्षण मार्गदर्शन केंद्राकरीता या दोन्ही योजनेंचा मंजूर निधी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगामार्फत संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यात येतो. तथापि, पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण योजना ही सन २०१९-२० पासून शासनामार्फत राबविण्यात येत आहे. या तीन्ही योजनांकरीता सन २०१९-२० वर्षासाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षा अंतर्गत एकत्रित एकूण रु.७.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण योजना ही सन २०१९-२० पासून शासनामार्फत राबविण्यात येत असल्यामुळे संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये या योजनाकरिता सन २०१९-२० वर्षासाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.७,००,००,०००/- इतक्या अर्थसंकल्पित निधीपैकी ६०% म्हणजेच रु.४,२०,००,०००/- (अक्षरी रूपये चार कोटी वीस लक्ष फक्त) इतका निधी पैकी रु.१.५०कोटी एवढा निधी पुर्नविनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यामुळे सद्यस्थितीत मराठी भाषा फौन्डेशन योजना व स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन या दोन योजनांकरीता आयोगाला निधी उपलब्ध करुन देण्याकरीता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षा अंतर्गत रु.२,७०,००,०००/- ( अक्षरी रूपये दोन कोटी सत्तर लक्ष फक्त) इतका निधी उपरोक्त दोन्ही योजनांकरीता वितरीत करण्यासाठी उपलब्ध आहे. संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने योजनांतर्गत बाबीसाठी निधी वितरण करण्याबाबत केलेल्या मागणीच्या अनुषंगाने सन२०१९-२० या आर्थिक वर्षात सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांना (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाअंतर्गत खालील प्रमाणे निधी मंजूर करण्यात येत आहे.

| "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **तपशील वार लेखाशिर्ष** | **सन २०१९-२० साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान** | **सन २०१९-२० साठी अर्थसंकल्पीय निधीचा ६०%** | **सन २०१९-२० मध्ये २२३५ सी २७९, ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाकरिता पुर्नविनियोजनाद्वारे अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले.** | **उर्वरित अनुदान** | **मंजूर उर्वरित अनुदान (६०% च्या प्रमाणात )** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **५** | **७** |
| १ | २२३५ ए २५८ | ७,००,००,०००/- | ४,२०,००,०००/- | १,५०,००,०००/- | २,७०,००,०००/- | २,७०,००,०००/- |
| **एकूण -रु.२,७०,००,०००/-(अक्षरी रुपये दोन कोटी सत्तर लक्ष फक्त)** | | | | | | |

२. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग,मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने उपरोक्त विवरण पत्रात दर्शविलेल्या निधीचा विनियोग विहित मर्यादेपर्यंतच करावा. संदर्भ क्र. ३ मधील सहपत्रात नमूद संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय यांना मराठी भाषा फाऊंडेशन या योजनेचा सन २०१८-१९ मधील शिल्लक व अखर्चित रु. २२,८७,०००/- (रुपये बावीस लक्ष सत्याऐंशी हजार फक्त) इतका निधी शासनाच्या कोषागारात तात्काळ जमा करण्याबाबत कळविण्यात यावे. सदर निधी शासन खाती जमा केल्याची चलनाची प्रत प्राप्त झाल्यानंतर त्यांना सन २०१९-२० मधील अनुदान वितरीत करण्यात यावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित नमून्यात शासनास सादर करणे आवश्यक राहील. संदर्भ क्र.१ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने करावे. तसेच सदर वितरीत निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत केले जाणार नाही.

३. उपरोक्त रक्कम “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग (योजनांतर्गत) (२२३५ ए २५८) (कार्यक्रमावरील खर्च), ३१सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभागक्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.”

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०९१०५६३७३५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.01.09 10:38:55 +05'30'

**( दि. मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,

३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,

६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

७) संचालक, लेखा व कोषागारे

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१२) कक्ष अधिकारी (का. ७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३) निवडनस्ती (कार्यासन-९).